आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती या योजनेंतर्गत सन २०२१-२२ करीता निधी वितरण...
(लेखाशिर्ष- ३०५५ ००४३ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी २०२१/ प्र.क्र.०९ (भाग-१) / का-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : -१७ फेब्रुवारी,२०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शा. नि. क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दि.६.०४.२०२१, दि.१४.१०.२०२१.
२) गृह (परिवहन) विभाग, नस्ती क्र.एसटीसी- ०१२१/प्र.क्र. ४/परि-१.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांच्या विकासाकरीता मागणी क्र.टी-५, ३०५५, मार्ग परिवहन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००- मार्ग परिवहन, ७९६- जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०१) आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती (३०५५ ००४३), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रु.१५००.०० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पीत आहे. सदर योजनेंतर्गत गडचिरोली येथील चालक प्रशिक्षण केंद्र विभागीय कार्यालयासह बांधकाम करणे व पांढरकवडा येथील चालक प्रशिक्षण केंद्राचे आधुनिकीकरण करणे या प्रगतीपथावरील दोन कामांसाठी एकूण रु.४३८.०० लाख निधी वितरीत करण्याबाबत परिवहन विभागाकडून संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावांस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती या योजनेंतर्गत सन २०२१-२२ या अर्थसंकल्पिय तरतुदींमधून **रु.४३८.७७ लाख (रुपये चार कोटी अडतीस लाख सत्याहत्तर हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई** यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वितरीत निधीमधून खालीलप्रमाणे प्रगतीपथावरील कामांवर खर्च करण्यात यावा :-

(रू.लाखात)

| अ. क्र. | कामाचे नांव | या शासन निर्णयान्वये वितरीत निधी |
|---|---|---|
| १ | गडचिरोली येथे चालक प्रशिक्षण केंद्र विभागिय कार्यालयासह बांधणे | २८०.४६ |
| २ | पांढरकवडा, जि. यवतमाळ येथील चालक प्रशिक्षण केंद्राचे नुतनीकरण | १५८.३१ |
| | **एकूण** | **४३८.७७** |

३. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी सदरचा खर्च आदिवासी उपयोजना क्षेत्रातच नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१४१४४८२९०७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.02.17 16:22:15 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव ( परिवहन ) , गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. महाव्यवस्थापक (बांधकाम), महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, मुंबई.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती/ नागपूर.
७. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा / गडचिरोली/ धारणी.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ, गडचिरोली, अमरावती.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन क्र. २ व १७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.